**डॉ. वर्षा अंधारे, अधिक्षक, सावित्रीदेवी फुले महिला वसतिगृह, मुंबई (सहाय्यक प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई) यांच्या निलंबनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : चौकशी-२०२३/प्र.क्र.९२/मशि-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १६ जुन, २०२३.

**संदर्भ :** १. महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ४
२. शासन निर्णय क्रमांक : चौकशी-२०२३/प्र.क्र.९२/मशि-१, दिनांक ७.६.२०२३ व दिनांक ८.०६.२०२३.

## शासन आदेश

डॉ. वर्षा अंधारे, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई येथे कार्यरत असून, त्यांच्याकडे अधिक्षक, सावित्रीदेवी फुले महिला वसतिगृह, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेला आहे.

२. सावित्रीदेवी फुले महिला वसतिगृहामध्ये दिनांक ६ जून, २०२३ रोजी अत्यंत दुर्दैवी व धक्कादायक घटना घडलेली आहे. संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये, सदर घटनेची उच्चस्तरीय चौकशी करण्यासाठी द्विसदस्यीय समिती गठित करण्यात आली आहे. सदर द्विसदस्यीय समितीने सादर केलेल्या अंतरिम अहवालामध्ये अधिक्षक यांच्या कामकाजाबाबत आक्षेप नोंदविण्यात आले असून, पुढील चौकशीत वसतीगृहात राहणाऱ्या मुलींचे व इतर संबंधितांचे जबाब घेण्यात येणार आहे. सदर समितीच्या चौकशीमध्ये अडथळा येऊ नये किंवा दबाव येऊ नये यासाठी सदर द्विसदस्यीय समितीमार्फत सदर घटनेची चौकशी होईपर्यंत डॉ. वर्षा अंधारे यांना निलंबित करण्यात येत आहे.

३. आणखी असे आदेश देण्यात येत आहे की, हा आदेश अंमलात असेल तेवढ्या कालावधीत डॉ. वर्षा अंधारे यांचे मुख्यालय मुंबई येथे राहील आणि त्यांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय मुख्यालय सोडता येणार नाही.

४. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी अधिक्षक, सावित्रीदेवी फुले महिला वसतिगृह, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार अन्य सक्षम अधिकाऱ्याकडे तात्काळ सोपवून, शासनास अहवाल सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१९१९२७०७३४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.06.19 19:29:15 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

डॉ. वर्षा अंधारे, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई.
(संचालक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत,**

(१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

(२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
(३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
(४) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
(५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
(६) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(७) विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई.
(८) संचालक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई यांच्यामार्फत.
(९) महालेखापाल (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र -१ मुंबई.
(१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(११) निवड नस्ती, मशि-१.